मासेमार नौकांवर संदेशवहन, मासळीचा शोध घेणे इ. अत्याधुनिक यंत्रसामुग्री खरेदीकरण्यासाठी अर्थसहाय्य देण्याची योजना राबविण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांक मत्स्यवि १००१/१६८७५/(११२)/पदुम १४
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३ ऑक्टोबर, २००१.

**वाचा :**

1. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. मत्स्यवि १०९६/१४४३२/(४९१)/पदुम १४ दि. १२ ऑक्टोबर,१९९९.
2. आयुक्त मत्स्यव्यवसाय यांचे क्र. मत्स्य/सा/०६११०१/४५६-२००१ दि. १९ मे,२००१ चे पत्र
3. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. बीजीटी २००१/प्र.क्र. ७४/०१/पदुम १६ दिनांक ९ ऑगस्ट,२००१.

**प्रस्तावना :**

संकटकाळात मच्छिमारांना एकमेकांशी संपर्क साधणे सोपे व्हावे, त्यांना समुद्रामध्ये मासळीच्या साठयाची योग्य माहिती मिळावी या करिता तसेच मच्छिमारांना विशिष्ट दिशेला कमीतकमी अंतराच्या मार्गाने पोहचण्याच्या दृष्टीने कोकण विकासाच्या कालबध्द कार्यक्रमांतर्गत २५ टन किंवा त्यापेक्षा जास्त वजनाच्या यांत्रिक नौकांवर वॉकी टॉकी सेट, एको साऊंडर व जी.पी.एस. नेव्हीगेटर या सारखी अत्याधुनिक यंत्रसामुग्री खरेदी करण्यासाठी मच्छिमारांना अर्थसहाय्य देण्याची योजना शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. मत्स्यवि १०९६/१४४३२/(४९१)/पदुम १४ दि. १२ ऑक्टोबर,१९९९ अन्वये मंजूर करण्यात आलेली आहे. सदर योजना सन २००१-०२ मध्ये पुढे चालू ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

कोकण विकासाच्या कालबध्द कार्यक्रमांतर्गत २५ टन किंवा त्यापेक्षा जास्त वजनाच्या यांत्रिक नौकांवर एको साऊंडर, जी.पी.एस. नेव्हीगेटर व वॉकी टॉकी या सारखी अत्याधुनिक यंत्रसामुग्री बसविण्यासाठी अर्थसहाय्य देण्याची योजना सन २००१-०२ मध्ये पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. ज्या लाभार्थींनी यापूर्वी शासकीय योजनेतून यांत्रिक नौकांसाठी लाभ घेतला असेल त्यांनाही खालील यंत्रसामुग्रीच्या खरेदीवर अनुदान देय आहे मात्र ज्यांना खालील यंत्रसामुग्रीसाठी यापूर्वी शासनाच्या इतर योजनांतून अर्थसहाय्य प्राप्त झाले असेल तर अश्या लाभार्थ्यांना या योजनंतर्गत पुन्हा अनुदान देण्यात येवू नये

२. या योजनेंतर्गत उपरोक्त यंत्रसामुग्रीवर खालीलप्रमाणे अर्थसहाय्य देय राहील. उर्वरित रक्कम लाभार्थिने स्वतः अथवा बँक/वित्तिय संस्थांमार्फत कर्जरुपाने उभी करावी. योजनेंतर्गत लाभार्थी निवडीच्या अटी, शर्ती व

कार्यपध्दती दिनांक १२/१०/१९९९ च्या शासन निर्णयाच्या परिशिष्ट -१ मध्ये दर्शविण्यात आल्या प्रमाणे राहतील.

| **यंत्रसामुग्री** | **अर्थसहाय्याचे प्रमाण व अर्थसहाय्याची कमाल मर्यादा** |
|---|---|
| एको साऊंडर | यंत्रसामुग्रीच्या किंमतीच्या २५ टक्के परंतु रु. १५,०००/- च्या मर्यादेत |
| जीपीएस नेव्हीगेटर | यंत्रसामुग्रीच्या किंमतीच्या २५ टक्के परंतु रु. ७५,०००/- च्या मर्यादेत |
| वॉकी टॉकी | यंत्रसामुग्रीच्या किंमतीच्या २५ टक्के परंतु रु. १२,५००/- च्या मर्यादेत |

३. या योजनेसाठी येणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली पूरक मागणीव्दारे मंजूर रु. ५४,३९,०००/- तरतूदीपैकी रु. ३२,६३,०००/- च्या मर्यादेत (६०% ) करण्यात यावा.

मागणी क्र. डी-७
२४०५ मत्स्यव्यवसाय
१०३ सागरी मत्स्यव्यवसाय
पंचवार्षिक योजनांतर्गत योजना
(०२)(११) यांत्रिक नौकांवर अत्याधुनिक यंत्रसामुग्री बसविणे
राज्य योजनांतर्गत योजना (२४०५ ११७ १)

४. या योजनेसाठी संबंधित जिल्ह्यांचे सहाय्यक मत्स्यव्यवसाय संचालक यांना आहरण व संनियंत्रण अधिकारी घोषित करण्यात येत आहे. आयुक्त मत्स्यव्यवसाय विकास यांनी या योजनेचा प्रगती अहवाल प्रत्येक महिन्याच्या १५ तारखेपूर्वी शासनास पाठवावा.

५. हे आदेश शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. प्रक्र ३१२/व्यय-१ दिनांक २.०७.२००१ व क्र. २५४६/अर्थोपाय/२००१ दिनांक २०/९/२००१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(सुजाता दि. ढोले )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
प्रादेशिक मत्स्यव्यवसाय उपसंचालक, मुंबई
सहाय्यक मत्स्यव्यवसाय संचालक(मुंबई/ठाणे (पालघर)/रायगड (अलिबाग)/ रत्नागिरी/ सिंधुदुर्ग (मालवण)
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, १ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), मुंबई
अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई

निवासी लेखा अधिकारी, मुंबई
जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/रायगड (अलिबाग)/रत्नागिरी/सिंधुदुर्ग (ओरस)
उपकोषागार अधिकारी, मालवण, जि. सिंधुदुर्ग व पालघर, जि. ठाणे
नियोजन विभाग,
वित्त विभाग (व्यय १, अर्थसंकल्प १४)
कक्ष अधिकारी (पदुम-१२, १३ व १६) कृषि व पदुम विभाग,
निवडनस्ती.